**विमानचालन संचालनालयातील उपसंचालक पदाच्या वेतनश्रेणी बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र. डीसीए २०१२/प्र.क्र.३४८/२८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १२/११/२०१४

## वाचा

1) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र. डीसीए २०१२/प्र.क्र.३४८/२८-अ, दि. २९/११/१२
2) शासन शुध्दीपत्र, सामान्य प्रशासन विभाग क्र. डीसीए २०१२/प्र.क्र.३४८/२८-अ, दि. ०३/०१/१३

## प्रस्तावना

संदर्भ क्र. १ येथील आदेशाद्वारे विमानचालन संचालनालयातील सहाय्यक संचालक या पदाचे पदनाम बदलुन त्याऐवजी उपसंचालक हे पदनाम धारण करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. २ येथील आदेशाद्वारे उपसंचालक, विमानचालन संचालनालय या पदाची वेतनश्रेणी पीबी-३: १५६६-३९१००+ग्रेड वेतन रु. ६६०० करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

तथापि, संदर्भ क्र. २ येथील शासन आदेश निर्गमित करण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभाग (सेवा) यांची तसेच वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली नसल्याने सदर शासन निर्णय रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

शासन शुध्दीपत्र, सामान्य प्रशासन विभाग क्र. डीसीए २०१२/प्र.क्र.३४८/२८-अ, दि. ०३/०१/२०१३ रद्द करण्यात येत असुन या शासन शुध्दीपत्रकात नमूद वेतनश्रेणीनुसार श्री. मा. बा. गोडबोले, उपसचिव यांना वेतन अदा करण्यात आले असल्यामुळे फरकाची रक्कम श्री. मा. बा. गोडबोले यांच्या वेतनातुन सुलभ हप्त्याद्वारे वसूल करण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाने अनौ. संक्र.२२८/२०१४/सेवा-९, दि. २१/०७/२०१४ रोजी दिलेल्या अभिप्रायांच्या अनुषंगाने काढण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११२१६०२२६३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2014.11.12 16:58:50 +05'30'

**(समीर सावंत)**
कक्ष अधिकारी,सामान्य प्रशासन विभाग.

प्रत,

१. अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

४. प्रधान सचिव (सा.प्र.वि.) (सेवा), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

५. प्रधान सचिव (उद्योग) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

६. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

७. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

८. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहु, मुंबई.

९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१२. निवडनस्ती, कार्यासन २८-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई